**“ब्लड ऑन कॉल- जीवन अमृत सेवा”**
**ही अभिनव योजना / उपक्रम मुंबईसाठी**
**वगळण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रारसे-२०१९/प्र.क्र.२६/आ-५,**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, ८ व १० मजला, नवीन मंत्रालय,
मुंबई- ४०० ००१.
दिनांक : १२ मार्च,२०२०

**वाचा :** १) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्रमांक:- रारसे-२०१३/प्र.क्र.२२५/आ-५ दि.३१ ऑक्टोंबर,२०१३

**प्रस्तावना :**

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या दि.४ जानेवारी,१९९६ रोजीच्या निदेशानूसार दि.४ जुलै,१९९६ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्रात राज्य रक्त संक्रमण परिषदेची स्थापना करण्यात आली आहे. राज्यात सुरक्षित रक्ताचा पुरवठा वाजवी किमतीत करणे, राष्ट्रीय रक्त धोरणाची राज्यात अंमलबजावणी करणे राज्यात रक्त संक्रमण सेवा प्रभावी व बळकट होऊन गरजू रुग्णास दर्जेदार, सुरक्षित रक्त सहज उपलब्ध करुन देणे ही राज्य रक्त संक्रमण परिषदेची मुख्य उद्दिष्टये आहेत. ज्यावेळी एखादया रुग्णास नर्सिंग होम किंवा रुग्णालयात दाखल असताना डॉक्टरांचे सल्ल्यानुसार रक्त चढवण्याची आवश्यकता असते, अशा वेळी रुग्णाच्या नातेवाईकास रक्तासाठी धावपळ करावी लागते व रुग्णास रक्त मिळण्यास विलंब होतो. रुग्णालयात दाखल असलेल्या रुग्णास आवश्यक असणाऱ्या रक्तासाठी त्याच्या नातेवाईकास धावपळ करावी लागू नये तसेच रुग्णास वाजवी दरात सुरक्षित रक्त पुरवठा व्हावा याकरिता राज्य रक्त संक्रमण परिषदेच्या माध्यमातून “ब्लड ऑन कॉल-जीवन अमृत सेवा” ही योजना / उपक्रम मुंबईसह राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये संदर्भाधिन शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आला होता. राष्ट्रीय रक्त धोरणानुसार गरजेच्या वेळी रुग्णास रक्त उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी संबंधित रुग्णालयाची आहे. मुंबई मध्ये ५९ रक्तपेढया आहेत व मुंबईतील रुग्णालयांनी त्यांना गरज असणाऱ्या रक्तासाठी रुग्णालयाच्या नजीकच्या रक्तपेढयांसोबत टायअप केलेले आहे. टायअप केलेल्या रक्तपेढया संबंधित भागातील रुग्णालयांना रक्त पुरवठा करीत असल्यामुळे व मुंबईतील रहदारी व वाहतुकीस लागणारा वेळ लक्षात घेता, संबंधित रुग्णालये दुरच्या रक्तपेढीऐवजी नजीकच्या रक्तपेढीतून रक्त घेण्यास प्राधान्य देतात. यावरुन प्रत्यक्ष रक्त युनिट वरील खर्चापेक्षा या योजनेंतर्गत रुग्णालयाकडून रक्ताची मागणी अत्यल्प होती. प्रशासकीय यंत्रणेसाठी लागणारे खचार्च प्रमाण खुपच

जास्त असल्याचे स्पष्ट झाले. ही बाब विचारात घेता, सदरची योजना मुंबईसाठी वगळण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुंबईतील रुग्णालयांनी त्यांना गरज असणाऱ्या रक्तासाठी रुग्णालयाच्या नजीकच्या रक्तपेढयांसोबत टायअप केलेले आहे. टायअप केलेल्या रक्तपेढया संबंधित भागातील रुग्णालयांना रक्त पुरवठा करीत असल्यामुळे व मुंबईतील रहदारी व वाहतुकीस लागणरा वेळ लक्षात घेता, संबंधित रुग्णालये नजीकच्या रक्तपेढीतून रक्त घेण्यास प्राधान्य देतात. त्यामुळे या योजनेंतर्गत रुग्णालयाकडून रक्ताची मागणी अत्यल्प होती. ही बाब विचारात घेता, सदरची योजना मुंबईसाठी वगळण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 202003121207554017 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d24847898197ddd6b0366a9177f097ed0887a, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=b4e19876ab3eec36e3a3b988441648ab87470cdfe66b14cfbe7ac9bd770485c1, ou=PUBLIC HEALTH DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2020.03.12 12:29:55 +05'30'

**( अर्चना वालझाडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, पंचदिप भवन, लोअर परेल, मुंबई.
२. अतिरिक्त आयुक्त, मुंबई महानगरपालिका, मुंबई.
३. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य एडस नियंत्रण सोसायटी,महाराष्ट्र/ मुंबई.
४. संचालक आरोग्य सेवा आरोग्य सेवा, संचालनालया, मुंबई.
५. संचालक, राज्य रक्त संक्रमण परिषद, मुंबई.
६. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
७. मा.मंत्री /मा.राज्य मंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव
८. सह संचालक, आरोग्य सेवा (हि.ह.व ज.रो.), पुणे
९. उप सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मुंबई.
१०. उपसंचालक आरोग्य सेवा (सर्व)

११.जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
१२.अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय (सर्व)
१३.प्रधान सचिव (आरोग्य) यांचे स्वीय सहायक
१४.उप सचिव (आरोग्य) सर्व
१५.निवडनस्ती (आ-५)